यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे बारामती, येथील उपकेंद्र व ग्रंथालय इमारतींचे बांधकाम करण्यास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

## शासन निर्णय क्र.बैठक-२०२१/प्र.क्र.३६/विशि-२

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : ०६ जुलै, २०२४.

**वाचा :-** १) विभागाचा समक्रमांकाचादि.२५.११.२०२१ रोजीचा शासन निर्णय.

२) विभागाचा समक्रमांकाचा दि.२६.०५.२०२२ रोजीचा शासन निर्णय.

३) कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे दि.१८.०६.२०२४ रोजीचे पत्र.

४) व्यय अग्रक्रम समितीची दि.०३.०७.२०२४ रोजीची बैठक.

**प्रस्तावना :-** यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक विद्यापीठाची स्थापना महाराष्ट्र विधी मंडळ कायदा क्र.२० अन्वये दि.०१.०७.१९८९ रोजी झाली आहे. विद्यापीठ अनुदान आयोगाची मान्यता असलेल्या या विद्यापीठाचे कार्यक्षेत्र संपूर्ण महाराष्ट्र राज्य आहे. महाराष्ट्रात या विद्यापीठाची अमरावती, नागपूर, औरंगाबाद, मुंबई, नाशिक, पुणे, कोल्हापूर व नांदेड असे ८ विभागीय केंद्र कार्यरत आहेत. विद्यापीठाच्या ८ विभागीय केंद्रामार्फत १६०० अभ्यासकेंद्रावर नियंत्रण ठेवले जाते. विद्यापीठाची जवळपास ६ लक्ष इतकी विद्यार्थी संख्या आहे. पुणे विभागीय केंद्रातंर्गत पुणे, सातारा व सोलापूर येथे अनुक्रमे १६०, ३६ व ७१ अशी एकूण २६७ अभ्यासकेंद्र असून, या अभ्यासकेंद्रावर एकूण १ लक्षपर्यंत विद्यार्थी प्रवेश घेतात. विद्यार्थ्यांची प्रवेश क्षमता विचारात घेता तसेच कामाचे विकेंद्रीकरण व्हावे या हेतूने विद्यार्थ्यांना सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी उपकेंद्राची आवश्यकता आहे त्यामुळे पुणे विभागीय केंद्रातंर्गत सध्या असलेल्या सातारा व सोलापूर जिल्ह्यासाठी बारामती येथे स्वतंत्र उपकेंद्र व ग्रंथालय करुन इमारत बांधकाम करणे प्रस्तावित होते.

बारामती येथे उपकेंद्र व रत्नागिरी इमारतीच्या बांधकामाचा प्रस्ताव सादर करण्यात आला होता. तदनुषंगाने संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये रु.९०६.५७ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. दरम्यान सदर बांधकामातवाढ/बदल करण्याच्या दृष्टीने व नव्याने प्रशासकीय मान्यता देण्याकरीता विनंती केली होती. त्यानुसार सदरचा प्रस्ताव उच्चाधिकार सचिव समितीपुढे ठेवण्याकरीता सार्वजनिक बांधकाम विभागास विनंती करण्यात आली होती. सदरचा प्रस्ताव दि.०६.०५.२०२२ रोजीच्या उच्चाधिकार सचिव समितीच्या बैठकीत ठेवण्यात आला होता. सदर बैठकीत दिलेल्या मान्यतेनूसार रु.२३.५० कोटी किमतीच्या अंदाजपत्रकास दि.२६.०५.२०२२ रोजी प्रशासकीय मान्यता देण्यात आली. तथापि, बांधकामाचे वाढीव काम, दरसूचीतील बदल व भाववाढीमूळे कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे संदर्भ क्र.३ येथील दि.१८.०६.२०२४ च्या पत्रान्वये

सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली होती. याअनुषंगाने सदरचा प्रस्ताव व्यय व अग्रक्रम समितीपुढे ठेवण्याकरीता सार्वजनिक बांधकाम विभागास विनंती करण्यात आली होती. सदरचा प्रस्ताव दि.०३.०७.२०२४ रोजीच्या व्यय व अग्रक्रम समितीच्या बैठकीत ठेवण्यात आला होता. सदर बैठकीत दिलेल्या मान्यतेनूसार रु.४२७८.३६ लक्ष किमतीच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** सदर मान्यतेस अनुसरुन खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

१. मौजे बारामती, ता.बारामती, जि.पुणे येथे यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे सातारा व सोलापूर जिल्ह्यासाठी उपकेंद्र व ग्रंथालय स्थापन करण्यासाठी उपकेंद्र व ग्रंथालय इमारतींच्या बांधकामास तक्ता "अ"मध्ये नमूद केलेल्या रु.४२७८.३६ लक्ष (अक्षरी रुपये बेचाळीस कोटी अठ्ठ्याहत्तर लक्ष छत्तीस हजार फक्त) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास (Recapitulation Sheet) दि.०३.०७.२०२४ रोजीच्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१. विद्यापीठाच्या प्राधिकरणाची आवश्यकती मान्यता घेण्यात यावी.
२. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हातीघ्यावे.
३. प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्वपरवानगी घ्यावी.
४. तांत्रिक मंजूरी देताना राज्यदर सूची बाह्यबाबीच्या दराकरिता शासनपरिपत्रक क्रमांक.२०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दि.११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.
५. प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करून उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.
६. प्रत्यक्ष काम करते वेळी पर्यावरण विभाग, शासननिर्णयक्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्येउल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.
७. स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करून सदर कामे पूर्ण करावीत.
८. इमारतीमध्ये दिव्यांगाकरिता उपलब्ध करून द्यावयाच्या विविध सोयींबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

२. हा शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने (सार्वजनिक बांधकाम विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११६/इमा-३, दि.०३.०७.२०२४) अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

३. सदरहू बांधकामावर होणारा खर्च "मागणी क्रमांक - एच-८, मुख्यलेखाशिर्ष- ४२०२ शिक्षण, सर्वसाधारण शिक्षण २०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण (४२०२००७९) या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७०९१६५३१६४००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SHARAD SARJERAO KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=be7c662076305763361521944ed5ba258ae7d29f78cddb94fc3e83bfa2424200, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=95D25EC736C5F76DA241E96AD9552FF908EFC6582DF4A4ECADD1C4C6CD038195, cn=SHARAD SARJERAO KOKATE
Date: 2024.07.09 17:04:20 +05'30'

**( शरद कोकाटे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) कुलगुरू, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक
६) कुलसचिव, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक
७) संचालक, उच्चशिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
८) सहसंचालक, उच्चशिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे/ औरंगाबाद.
९) महालेखापाल, (लेखावअनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
१०) महालेखापाल, (लेखापरीक्षण) -१/२ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
११) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे/ नाशिक.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नाशिक.
१३) नियोजन विभाग (१४७१), मंत्रालय, मुंबई.
१४) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-३)/(व्यय-५) मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१७) निवडनस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

"तक्ता अ"

| अ क्र | परिमाण | मुळ परिमाण | सुधारित परिमाण | मुळ किंमत | सुधारित किंमत | वाढ/घट |
|---|---|---|---|---|---|---|
| शासन निर्णय क्रमांक क्र.बैठक-२०२१/प्र.क्र.३६/विशि-२ दि.०६.०७.२०२४ सोबतचे विवरपत्र. | | | | | | |
| यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक यांचे बारामती, येथील उपकेंद्र व ग्रंथालय इमारतींचे बांधकाम करण्यास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत | | | | | | |
| | **Building Proper** | | | | | |
| 1 | Construction of Building | 6096.60 Sq.mt. | 6096.60 Sq.mt. | 138837000.00 | 272741812.00 | 133904812.00 |
| 2 | **Electrification Work** | | | | | |
| | Internal Electrification | 5% 0n building cost | As per Actual | 6941850.00 | 28028120.00 | 11256050.00 |
| | Exernal Electrification | 6% 0n building cost | | 8330220.00 | | |
| | Fire fighting arrangment | L.S. | | 1500000.00 | | |
| 3 | Water Supply & Sanitation | 5% 0n building cost | Considered in Building cost | 6941850.00 | 0.00 | -6941850.00 |
| 4 | Furniture Work | 3448.30 Sqm | 3448.30 Sqm | 17241500.00 | 17241500.00 | 0 |
| 5 | Rain Water Harvesting | L. S. | Considered in Building cost | 500000.00 | 0.00 | -500000.00 |
| 6 | Compound Wall | 310.00 Rmt | As per Estmate | 2480000.00 | 18028708.00 | 7048708.00 |
| 7 | Internal Road | L.S. | | 600000.00 | | |
| 8 | Parking Arrangement | L.S. | | 500000.00 | | |
| 9 | Land Scaping | L.S. | | 2000000.00 | | |
| 10 | CC Drains and C/D works | L.S. | Considered in Building cost | 500000.00 | 0.00 | -500000.00 |
| 11 | Ramp For Handicap | L.S. | Considered in Building cost | 100000.00 | 0.00 | -100000.00 |
| | **Optional Items** | | | | | |
| 12 | Underground water tank | L.S. | Considered in Building cost | 500000.00 | 0.00 | -500000.00 |
| 13 | Water Main Storage, Borewell & Pump House | L.S. | Considered in Building cost | 500000.00 | 0.00 | -500000.00 |
| | **Provisions** | | | | | |
| | Contengencies | 4% on Project cost | 3% on Project cost | 5553480.00 | 5553480.00 | 0 |
| | Add Price Escalation | 5 % on project cost | 5 % on project cost | 9643621.00 | 15730562.00 | 6086941.00 |
| | Add 12% GST on Project Cost Before 1st July 2022 | 12% on Project Cost | | 23144690.00 | 0.00 | 38738260.00 |
| | Add 18% GST on Project Cost From 1st July 2022 | | 18 % on Project Cost | 0.00 | 618829050.00 | |
| | Labour Insurnace | 0.5 % on work done | 1.0 % on work to be done | 964362.00 | 3157661 | 2193299.00 |
| | Archtectural Service | 1.5% on Project Cost | 2 % on Project Cost | 2893086.00 | 4316640.00 | 1423554.00 |
| | Royalty & Testing | No Provision. | As per Actual Estimate | 1154820.00 | 0.00 | 1154820.00 |
| | **Total Amount** | | | **235071660.00** | **427836253.00** | **192764594** |

SHARAD SARJERAO KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=be7c6620763057633615219 44ed5ba258ae7d29f78cddb94fc3e83bfa2424200,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=95D25EC736C5F76DA241E96AD9552FF908EFC6582DF4A4ECADD1C4C6CD038195, cn=SHARAD SARJERAO KOKATE
Date: 2024.07.09 17:04:47 +05'30'

( शरद कोकाटे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन